पालघर या नवनिर्मित जिल्हयात जिल्हा उद्योग केंद्र हे कार्यालय सुरु करण्यासाठी व त्या कार्यालयासाठी पदनिर्मिती करण्याबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग**
**शासन निर्णय क्रमांक : इएसटी-३४१४/६२२/प्र.क्र.९३/उद्योग-३**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.
दिनांक : २६ ऑक्टोबर, २०१६.

पहा : १) शासन अधिसूचना, महसूल व वन विभाग, क्र.प्राफेब-११०८/प्र.क्र.१६७/ठाणे/म-१०, दि.३१/७/२०१४.
२) उद्योग संचालनालयाचे पत्र क्र.उसं/आस्था/पदनिर्मिती/२०१४/अे-१०२२, दि.१३.०८.२०१४
३) मुख्य सचिव यांच्या अध्यक्षतेखालील उच्चस्तरीय सचिव समितीच्या दि.०९.०९.२०१६ च्या १०३ व्या बैठकीचे इतिवृत्त.
४) शासन निर्णय क्र.आयएसटी-१७०२/(७०८१)/उद्योग-३, दि.२१.०१.२००६.
५) वित्त विभाग शा.प.क्र.पदनि-२०१३/प्र.क्र.११/१३/विसु-१, दि.०२.०२.२०१३.
६) वित्त विभाग शा.प.क्र.पदनि-२०१३/प्र.क्र.११२/१३/विसु-१, दि.०२.१२.२०१३.

**प्रस्तावना:**

संदर्भाधीन क्र.१ च्या अधिसूचनेव्दारे ठाणे जिल्ह्याचे विभाजन करुन दि.१/८/२०१४ पासून पालघर, वसई, डहाणू, तलासरी, जव्हार, वाडा, मोखाडा आणि विक्रमगड या तालुक्यांचा समावेश करुन पालघर हा नवीन जिल्हा निर्माण करण्यात आला आहे. या नवनिर्मित पालघर जिल्ह्याकरीता महाव्यवस्थापक, जिल्हा उद्योग केंद्र, पालघर हे कार्यालय सुरु करण्याबाबत आणि या कार्यालयासाठी नवीन पदे निर्माण करण्याचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन होता.

**शासन निर्णय :**

नवनिर्मित पालघर जिल्ह्यामध्ये महाव्यवस्थापक, जिल्हा उद्योग केंद्र, पालघर हे कार्यालय सुरु करण्यास मान्यता देण्यात येत आहे. तसेच या जिल्ह्याच्या कार्यक्षेत्रात येणारे वसई, पालघर, डहाणू, तलासरी, जव्हार, वाडा, मोखाडा आणि विक्रमगड हे ८ तालुके महाव्यवस्थापक, जिल्हा उद्योग केंद्र, ठाणे या कार्यालयाकडून महाव्यवस्थापक, जिल्हा उद्योग केंद्र, पालघर या नवनिर्मित कार्यालयाकडे वर्ग करण्यात येत आहे.

२. महाव्यवस्थापक, जिल्हा उद्योग केंद्र, पालघर या कार्यालयाकरीता नवीन पदनिर्मिती करण्याबाबतचा प्रस्ताव मुख्य सचिव यांच्या अध्यक्षतेखालील उच्चस्तरीय समितीसमोर दि.०९.०९.२०१६ च्या बैठकीमध्ये सादर करण्यात आला असता समितीने दिलेल्या मान्यतेनुसार खालील **विवरणपत्र "अ"** मध्ये दर्शविल्यानुसार एकूण ६ नवीन पदे निर्माण करण्यास मान्यता देण्यात येत आहे. **विवरणपत्र "ब"**

मध्ये दर्शविल्यानुसार एकूण ३ पदे वित्त विभागाच्या संदर्भ क्र.५ व ६ येथील परिपत्रकातील तरतुदीनुसार बाह्ययंत्रणेद्वारे (कंत्राटी पध्दतीने) भरण्याची कार्यवाही उद्योग संचालनालयाकडून करण्यात यावी.

**विवरणपत्र "अ"**

| अ. क्र. | पदनाम | संवर्ग | वेतनश्रेणी (मंजूर आकृतीबंधाप्रमाणे संवर्गाची वेतनश्रेणी) | मंजूर पदसंख्या |
|---|---|---|---|---|
| १ | महाव्यवस्थापक / अधिक्षकीय उद्योग अधिकारी | गट-अ | पीबी-१-१५६००-३९१०० जीपी६६००- | १ |
| २ | मुख्य लिपिक/वरिष्ठ लिपिक सांख्यिकी | गट-क | पीबी-२-९३००-३४८०० जीपी-४२०० | १ |
| ३ | लघुलेखक (निम्नश्रेणी) | गट-क | पीबी-२-९३००-३४८०० जीपी४३००- | १ |
| ४ | उद्योग निरीक्षक (क.श्रेणी) | गट-क | पीबी-२-९३००-३४८०० जीपी-४२०० | १ |
| ५ | शाखा प्रमुख | गट-क | पीबी-२-९३००-३४८०० जीपी-४२०० | १ |
| ६ | टिप्पणी सहाय्यक | गट-क | पीबी-१-५२००-२०२०० जीपी-२४०० | १ |
| | **एकूण पदे:** | | | **६** |

**विवरणपत्र "ब"**

| अ. क्र. | कंत्राटी पध्दतीने भरावयाची पदे | संवर्ग | बाह्ययंत्रणेद्वारे काम करुन घेण्याच्या कामाचे प्रदान "वेतन" | पदांची संख्या |
|---|---|---|---|---|
| १ | लिपिक-टंकलेखक | गट-क | वित्त विभाग परिपत्रक दि.०२.०२.२०१३ व ०२.१२.२०१३ मधील तरतुदीनुसार | १ |
| २ | शिपाई/पहारेकरी | गट-ड | -//- | २ |
| | **एकूण पदे :** | | | **३** |

३. उच्चस्तरीय सचिव समितीने दिलेल्या मान्यतेनुसार महाव्यवस्थापक, जिल्हा उद्योग केंद्र, ठाणे या कार्यालयातील खालील **विवरणपत्र "क"** मध्ये दर्शविलेली ५ पदे नवनिर्मित पालघर जिल्ह्यातील महाव्यवस्थापक, जिल्हा उद्योग केंद्र, पालघर या कार्यालयाकडे कायमस्वरुपी वर्ग करण्यात येत आहेत.

**विवरणपत्र "क"**

| अ. क्र. | पदनाम | संवर्ग | वेतनश्रेणी | मंजूर पदसंख्या |
|---|---|---|---|---|
| १ | उद्योग अधिकारी (तांत्रिक) | गट-ब | पीबी-२-९३००-३४८०० जीपी-४४०० | १ |
| २ | उद्योग निरीक्षक (क.श्रेणी) | गट-क | पीबी-२-९३००-३४८०० जीपी-४२०० | २ |
| ३ | लिपिक-टंकलेखक | गट-क | पीबी-१-५२००-२०२०० जीपी-१९०० | १ |
| ४ | वाहनचालक | गट-क | पीबी-१-५२००-२०२०० जीपी-१९०० | १ |
| | **एकूण पदे:** | | | **५** |

४. **विवरणपत्र "अ"** व **विवरणपत्र "क"** मध्ये दर्शविण्यात आलेल्या एकूण ११ पदांवरील वेतन व भत्त्यांचा खर्च मागणी क्र. के-७, मुख्यलेखाशीर्ष २८५१-ग्रामोद्योग व लघुउद्योग, (००) (०९) जिल्हा उद्योग केंद्राची स्थापना, ०१ वेतन (२८५१ ०५०२) या लेखाशिर्षाखाली उपलब्ध असलेल्या तरतूदीतून तसेच **विवरणपत्र "ब"** येथील बाह्ययंत्रणेद्वारे (कंत्राटी पध्दतीने) पदांसाठी होणारा खर्च वित्त विभागाच्या संदर्भ क्र.५ व ६ च्या परिपत्रकानुसार कार्यालयीन खर्चातून भागविण्यात यावा.

५. पालघर जिल्ह्यासाठी नवीन पदे मंजूर केल्याने व जिल्हा उद्योग केंद्र, ठाणे येथील उपरोक्त पदे वर्ग केल्याने संदर्भ क्र.४ च्या आदेशान्वये मंजूर केलेल्या आकृतीबंधात बदल संभवत आहे. त्यानुसार आकृतीबंधात बदल करण्यात येईल.

६. सदर शासन निर्णय वित्त विभागाच्या संदर्भ क्र.३ येथील बैठकीच्या दि.२६.०९.२०१६ च्या इतिवृत्तानुसार, वित्त विभागाच्या अनौपचारीक संदर्भ क्र.५६/१६/व्यय-१६, दि.२०.०२.२०१६ व अनौपचारीक संदर्भ क्र.८९/विसु-१, दि.०४.०४.२०१६ अन्वये प्राप्त झालेल्या सहमतीनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

७. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आले असून त्याचा संकेतांक २०१६१०२६११४२४१११० असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकीत करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Namdeo Kondiba Bhosale

Digitally signed by Namdeo Kondiba Bhosale
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=IEL Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=8db1ca2341132b954db9052b5ef3bd93e7410456a96fa70df7ff81c68231fcd3, serialNumber=8c6a286229ecc7982a08553f49d547ef64be25c7f26fc96324ece7cccbfeb8c5, cn=Namdeo Kondiba Bhosale
Date: 2016.10.26 11:46:12 +05'30'

**( डॉ.ना.कों.भोसले )**
उप सचिव, महाराष्ट्र शासन.

**प्रत:-**

१. मा. मंत्री (उद्योग) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
२. मा. राज्यमंत्री (उद्योग) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
३. प्रधान सचिव (उद्योग) यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई
४. विकास आयुक्त (उद्योग), उद्योग संचालनालय, नवीन प्रशासकीय भवन, मुंबई-३२
५. सर्व उद्योग सहसंचालक, विभागीय कार्यालये
६. सर्व महाव्यवस्थापक/व्यवस्थापक, जिल्हा उद्योग केंद्र
७. महालेखापाल, (लेखापरिक्षा / लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र-१/२, मुंबई.
८. जिल्हा कोषागार अधिकारी, पालघर/ठाणे.
९. वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई.
१०.सर्व उप सचिव/अवर सचिव/कक्ष अधिकारी, उ.,ऊ.व कामगार विभाग, मंत्रालय,मुंबई.
११.निवडनस्ती (उद्योग-३).